न्यायाधीन कैदयांची न्यायालयात तथा रुग्णालयात ने-आण करण्यासाठी पोलीस आयुक्त, बहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर विविध संवर्गातील ६०९ पदे निर्माण करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांकःएमआयएस ०१०४/प्र.क्र.७७/२/पोल-८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:-१२ जुलै, २००४

वाचा:- १) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र पोमसं/२६/४९/कैदी पार्टी/२००१, दि.२५.७.२००१.
२) शासनपत्र गृह विभाग क्र.बीजीटी १००४/नवीन बाब/२००४-०५/बीयुडी-१, दि.२ जुलै, २००४.

**शासन निर्णय:-**

न्यायाधिन कैदयाना न्यायालयीन सुनायणीकरीता न्यायालयाने नेमून दिलेल्या दिनांकास वेळेवर उपस्थित करणे आवश्यक असते. त्याकरीता तसेच कारागृहातील कैदयांना उपचाराकरीता रुग्णालयात नेण्याकरीताही कैदयांना पोलीस संरक्षण पुरविणे आवश्यक असते. यासाठी आवश्यक असलेल्या कर्मचारी वर्गाचा तुलनेत उपलब्ध असलेला पोलीस कर्मचारी वर्ग अपुरा असल्याने कैदयांना न्यायालयात वेळेवर हजर करणे शक्य होत नाही. त्यामुळे न्यायालयात प्रकरणे प्रलंबित तर रहातातच त्याचबरोबर कैदयांनाही त्यांच्या न्याय हक्कापासून वंचित रहावे लागते. यावर न्यायालयाने वेळोवेळी नाराजी व्यक्त केली आहे. ही बाब विचारात घेऊन कैदयांची ने आण करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई आस्थापनेवर विविध संवर्गातील ६०९ पदे निर्माण करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करावयाच्या एकूण पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | पद | पदांची संख्या | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|
| १ | पोलीस निरीक्षक | १ | ७४५०-२२५-११०५० |
| २ | सहा.पोलीस निरीक्षक | २ | ६५००-२००-१०५०० |
| ३ | पोलीस उपनिरीक्षक | ३५ | ५५००-१७५-९००० |
| ४ | सहा.पोलीस उपनिरीक्षक | ३५ | ४५००-१२५-७००० |
| ५ | पोलीस हवालदार | ११० | ४०००-१००-६००० |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | पोलीस शिपाई | ४२६ | ३०५०-७५-३९५०-८०-४५९० |
| | एकूण | ६०९ | |

२. वरील परिच्छेदात नमूद पदांना मोहमीचे वेतन व भत्ते देय असून त्याची मुदत प्रथमतः कार्यभार स्विकारल्यापासून दि.२८ फेब्रुवारी, २००५ पर्यंत राहील.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले मनुष्यबळ ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेल्या पदांचा इतरत्र वापर न करता ती पदे त्याच कारणासाठी वापर करण्याची जबाबदारी संबंधित पोलीस आयुक्त यांची राहील.

४. यासाठी होणारा खर्च २०५५-पोलीस-१०८ (दोन) (१) शहर पोलीस ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली सन २००४-०५ वर्षाकरीता मे २००४ मध्ये मंजूर केलेल्या नवीन बाब क्र.४ अन्वये मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच अतिरिक्त अर्थसंकल्पासह एकूण तरतूदीच्या १/१२ रक्कम दरमहा वितरित करावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२८४/०४/व्यय-७, दि.४.६.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रा. ग. गुंजाळ )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रती,

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
३) महालेखापाल महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) वित्त विभाग (व्यय-७)/(अर्थसंकल्प-१०) मंत्रालय, मुंबई.
७) गृह विभाग, बीयुडी-१, पोल-३,
८) निवड नस्ती (पोल-८)

*****